COVID-१९ विषाणुच्या प्रादुर्भावामुळे पसरलेली रोगरोई नियंत्रित करण्यासाठी उपाययोजना करण्यासाठी विभागीय आयुक्तांना निधी वितरित करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.१२३/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ मार्च, २०२०

**संदर्भ** : केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे क्र. ३३-४/२०२०-MDM-I, दिनांक १४ मार्च, २०२० चे पत्र

**प्रस्तावना**:

देशात व राज्यामध्ये COVID-१९ विषाणुचा प्रादुर्भाव झाल्यामुळे रोगराई नियंत्रित करण्याची आवश्यकता विचारात घेवून आवश्यक उपाययोजना करण्यासाठी राज्य कार्यकारी समितीची दिनांक १६ मार्च, २०२० रोजी मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार COVID-१९ विषाणुच्या प्रादुर्भावामुळे पसरणारी रोगरोई नियंत्रित करण्यासाठी विलगीकरण कक्ष स्थापन करणे,त्यासाठी तात्पुरती निवासी व्यवस्था करणे, अन्न, कपडे, वैद्यकीय देखभाल इत्यादी तसेच अतिरिक्त चाचणी प्रयोगशाळा स्थापन करण्याचा खर्च, अग्निशमन, पोलीस,स्थानिक स्वराज्य संस्था व आरोग्य सेवेतील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक संरक्षणासाठी प्रतिरोधक साधनांचा खर्च व व्हेंटीलेटर, हवा शुध्दीकरण यंत्र, थर्मल स्कॅनर्स व इतर साधनांचा खर्च भागविण्यासाठी सर्व जिल्हयांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:

देशात व राज्यामध्ये COVID-१९ विषाणुचा प्रादुर्भाव झाल्यामुळे रोगराई नियंत्रित करण्याची आवश्यकता विचारात घेवून उपाययोजना करण्यासाठी राज्य कार्यकारी समितीची दिनांक १६ मार्च, २०२० रोजी मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार COVID-१९ विषाणुच्या प्रादुर्भावामुळे पसरणारी रोगरोई नियंत्रित करण्यासाठी खालील बाबींवरील खर्च भागविण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून (S.D.R.F.) एकूण रूपये ४५,००,००,०००/- (रूपये पंचेचाळीस कोटी फक्त) विभागीय आयुक्तांना वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

अ) बाधित झालेल्या व्यक्तींसाठी विलगीकरण कक्ष (घरातील विलगीकरण वगळून) स्थापन करणे, त्यासाठी तात्पुरती निवासी व्यवस्था करणे, अन्न, कपडे, वैद्यकीय देखभाल, नमुने गोळा करण्यावरील खर्च, तपासणी/छाननी व contact tracing साठी सहाय्य इत्यादी

ब) शासनाच्या अतिरिक्त चाचणी प्रयोगशाळा स्थापन करण्याचा खर्च व उपभोग्य वस्तू (Consumables), अग्निशमन, पोलीस,स्थानिक स्वराज्य संस्था व आरोग्य सेवेतील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक संरक्षणासाठी प्रतिरोधक साधनांचा खर्च व व्हेंटीलेटर,हवा शुध्दीकरण यंत्र, थर्मल स्कॅनर्स व इतर साधनांचा खर्च .

२. राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे वरील बाबींवरील खर्च भागविण्यासाठी विभागीय आयुक्तांना रूपये ४५ कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्तांनी आवश्यकतेनुसार बाधित जिल्हयांना तात्काळ निधी उपलब्ध करून दयावा.

| अ.क्र | विभागीय आयुक्त | वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, कोकण | रु. १५ कोटी |
| २ | विभागीय आयुक्त, पुणे | रु. १० कोटी |
| ३ | विभागीय आयुक्त, नागपूर | रु. ५ कोटी |
| ४ | विभागीय आयुक्त, अमरावती | रु. ५ कोटी |
| ५ | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | रु. ५ कोटी |
| ६ | विभागीय आयुक्त, नाशिक | रु. ५ कोटी |
| **एकूण** | | **रु. ४५ कोटी** |

उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर सर्व विभागीय आयुक्तांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

३. वरील निधी खर्च करताना राज्य शासनाच्या इतर विभागाच्या योजनांमधून खर्चाची व्दिरूक्ती होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी तसेच आरोग्य यंत्रणेने घ्यावी. उपरोक्त परिच्छेद १(अ) मधील वैद्यकीय देखभालीवर होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानामधून देखील करण्यात यावा. या यासंदर्भात केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाच्या दिनांक १४.३.२०२० च्या पत्रातील सुधारित सुचना विचारात घेण्यात याव्यात. सदर पत्राची प्रत सोबत जोडली आहे.

४. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०४) इतर बाबी, ३१ सहाय्यक अनुदाने (२२४५ ०२४४) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येत आहे. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ८०/२०२०/व्यय-९,दिनांक १६.३.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००३१७११२८०५२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.03.17 11:32:47 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,

२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग ),जी.टी.हॉस्पीटल, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई,
८. संचालक (आरोग्य सेवा), महाराष्ट्र राज्य,मुंबई,
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५. मा.मंत्री(मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१६. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१७. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
२०. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ ).

No. 33-4/2020-NDM-I

Government of India
Ministry of Home Affairs
(Disaster Management Division)

C-Wing, 3rd Floor, NDCC-II
Jai Singh Road, New Delhi-110001
Dated 14.03.2020

To

The Chief Secretaries
(All States)

**Subject: Items and Norms of assistance from the State Disaster Response Fund (SDRF) in wake of COVID-19 Virus Outbreak**

Sir/Madam

I am directed to refer this Ministry's letter No. 33-4/2020-NDM-I dated 14th March 2020 on the above mentioned subject and to enclose herewith ***partially modified*** list of items and norms of assistance for containment of COVID-19 Virus in India, eligible from SDRF.

Yours faithfully,

(Sanjeev Kumar Jindal)
Joint Secretary to Government of India
Tel: 23438096

Copy to AS(UT), MHA for making similar provisions for utilization of UT Disaster Response Funds by the Union Territories.

CC for information: PS to HM/MOS(N)/HS

**Annexure to Ministry of Home Affairs letter No. 33-4/2020-NDM-I dated 14.03.2020**
**Modified List of items & norms of assistance from State Disaster Response Fund (SDRF) in the wake of COVID-19 virus outbreak**

| Sl. No. | ITEMS | NORMS OF ASSISTANCE |
|---|---|---|
| 1. | **Measures for quarantine, sample collection and screening:**<br><br>(a) Provision for temporary accommodation, food, clothing, medical care, etc. for people affected and sheltered in quarantine camps (other than home quarantine) or for cluster containment operations.<br><br>(b) Cost of consumables for sample collection.<br><br>(c) Support for checking, screening and contact tracing. | As per actual expenditure and as per the assessment of need by State Executive Committee (SEC), to ensure the effective containment of outbreak for a period upto 30 days. The SEC will decide the number of quarantine camps, their duration and the number of persons in such camps.<br><br>*This period can be extended by the SEC beyond the prescribed limit subject to condition that expenditure on this account should not exceed 25% of SDRF allocation for the year.*<br><br>Medical care may also be provided from National Health Mission (NHM). |
| 2. | **Procurement of essential equipments/labs for response to COVID-19:**<br>a) Cost of setting up additional testing laboratories within the Government and the cost of consumables.<br>(b) Cost of personal protection equipment for healthcare, municipal, police and fire authorities.<br>(c) Cost of Thermal Scanners, ventilators, air purifiers, and consumables for Government hospitals. | Expenditure is to be incurred from SDRF only (and not from NDRF), as assessed by the State Executive Committee (SEC) to strengthen the surveillance and control measures against COVID-19 virus outbreak.<br><br>Total expenditure on equipment should not exceed 10 % of the annual allocation of the SDRF |

Note:-

1. SEC shall ensure overall oversight mechanism so that no duplication takes place with reference to other Government schemes.
2. Any amount spent by the State for COVID-19, over and above the ceiling, would be borne out of the resources of the State Government and not from SDRF.

***

14/3/2020